पोलीस उपनिरीक्षक (मुख्य) परीक्षा-2013 दि. 8 डिसेंबर, 2013

प्रश्नपुस्तिका क्रमांक पेपर - I

BOOKLET No.

2013 Code : Y02




# प्रश्नपुस्तिका

## मराठी व इंग्रजी

वेळ : 1 (एक) तास

एकूण प्रश्न : 100

एकूण गुण : 100

## सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत **100** अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.




(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची दिलेल्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये

SEAL

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरूद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा

1. 'संगर' शब्दाचा समानार्थी शब्द निवडा.
   (1) नांगर (2) लढाई (3) सागर (4) संदल

2. विरुद्धार्थी शब्द लिहा.
   अग्रज –
   (1) वंशज (2) पूर्वज (3) मनोज (4) अनुज

3. 'द्विज' शब्दाचा अर्थ ________ आहे.
   (1) दात (2) हात (3) ओठ (4) यांपैकी नाही

4. 'चला पानावर बसा' या वाक्यातील शब्दशक्ती ओळखा.
   (1) व्यंगार्थ (2) लक्षार्थ (3) वाच्यार्थ (4) संकेतार्थ

5. 'ताई भावाला ओवाळते' यांतील 'ताई' हा शब्द मूळ कोणत्या भाषेतील आहे ?
   (1) कानडी (2) गुजराथी (3) मराठी (4) संस्कृत

6. 'पाय' हा शब्द कोणत्या प्रकारचा आहे ?
   (1) तत्सम (2) तद्भव (3) देशी (4) विदेशी

7. खालील विधानांपैकी योग्य विधान निवडा.
   (1) प्रत्यय हे नेहमी शब्दाच्या/धातूच्या पूर्वी येतात. (2) उपसर्गाला स्वत:चा सूचक अर्थ असतो.
   (3) सामासिक शब्दात दोन शब्द एकत्र येत नाहीत. (4) 'देशज' शब्दात विदेशी शब्द अंतर्भूत असतात.

8. महान राष्ट्र – महाराष्ट्र या शब्दाचा समास ओळखा.
   (1) तत्पुरुष (2) अव्ययीभाव (3) बहुव्रीही (4) कर्मधारय

9. 'आंबा' हा शब्द ________ प्रकारात मोडतो.
   (1) तद्भव (2) तत्सम (3) बोली (4) कृदन्त

10. 'आता विश्वात्मके देवे' यांत 'देवे' शब्दाची विभक्ती कोणती ?
   (1) द्वितीया (2) तृतीया (3) षष्ठी (4) सप्तमी

11. 'ञ्' ह्या वर्णाचा प्रकार कोणता ?
   (1) नासिक्य (2) अनुनासिक (3) तालव्य (4) दंततालव्य

**12.** व्यंजनांना अक्षरत्व येण्यासाठी काय करावे ?

(1) दोन व्यंजनांचे एकत्रीकरण (2) व्यंजन व स्वर यांचे एकत्रीकरण
(3) दोन स्वरांचे एकत्रीकरण (4) व्यंजनामधून स्वर काढून टाकणे

---

**13.** खालीलपैकी अर्धस्वर ओळखा.

(1) अ् (2) ऋ् (3) ल् (4) लृ्

---

**14.** वाक्यात उपयोग होताना कांही शब्दांच्या लिंग वचन रूपात बदल होतो. त्या बदलास ________ म्हणतात.

(1) प्रत्यय (2) प्रकृती (3) परिवर्तन (4) विकार

---

**15.** खालील अधोरेखित विशेषणाचा प्रकार ओळखा.

'<u>वरचा</u>' मजला रिकामा

(1) गुणविशेषण (2) नामसाधित विशेषण
(3) अविकारी विशेषण (4) अव्ययसाधित विशेषण

---

**16.** संयुक्त क्रियापद म्हणजे

(1) कृदन्त + धातुसाधित (2) प्रयोजक क्रियापद + शक्य क्रियापद
(3) धातू + क्रियादर्शक पद (4) धातुसाधित + सहाय्यक क्रियापद

---

**17.** संस्कृतमध्ये क्रियापदाला ____________ म्हणतात.

(1) आख्यात (2) कार्यपद (3) कृदन्त (4) उद्देश्य

---

**18.** 'पृथकत्ववाचक' संख्याविशेषणाचे उदाहरण कोणते ?

(1) छपन्न मोती (2) पाचवी खेप (3) थोडी विश्रांती (4) एकेक मुलगा

---

**19.** खालील अधोरेखित शब्दांचा क्रियाविशेषण अव्ययाचा प्रकार ओळखा.

'मामा येथे <u>क्वचित</u> येतात.'

(1) कालवाचक क्रियाविशेषण अव्यय (2) स्थलवाचक क्रियाविशेषण अव्यय
(3) रीतिवाचक क्रियाविशेषण अव्यय (4) परिणाम दर्शक क्रियाविशेषण अव्यय

---

**20.** खालील वाक्यातील अधोरेखित उभयान्वयी अव्ययाचा प्रकार ओळखा.

'माईंनी खूप त्रास काढला, <u>म्हणून तर</u> आता ते सुखात जगताहेत.'

(1) उद्देशबोधक उभयान्वयी अव्यय (2) न्यूनत्वबोधक उभयान्वयी अव्यय
(3) परिणामबोधक उभयान्वयी अव्यय (4) स्वरूपबोधक उभयान्वयी अव्यय

---

21. उद्देश्यांग म्हणजे काय ?
(1) कर्म व त्याबद्दलची विशेष माहिती.
(2) कर्ता व त्याबद्दलची विशेष माहिती.
(3) क्रियापद व त्याबद्दलची विशेष माहिती.
(4) यापैकी नाही.

22. खालीलपैकी शुद्ध शब्द ओळखा.
(1) निर्भत्सना (2) नि:र्भत्सना (3) निभर्त्सना (4) निर्भर्त्सना

23. कान निराळे टाकणे म्हणजे
(1) दुसरीकडे लक्ष देणे.
(2) ऐकून न ऐकल्यासारखे भासविणे.
(3) दुर्लक्ष करणे.
(4) दुसऱ्याचे न ऐकता चिंतन करणे.

24. 'मी तुम्हाला एकही अक्षर बोललो नाही.'
या वाक्यातील उद्देश कोणते ?
(1) तुम्हाला (2) अक्षर (3) मी (4) एकही

25. पहिले पद संख्यावाचक असून त्यावरून समूहाचा बोध होत असेल तर तो ________ समास होतो.
(1) बहुव्रीही (2) कर्मधारय (3) द्विगू (4) द्वन्द्व

26. 'त्वा काय शस्त्र धरिजे लघुलेकराने' – प्रयोग प्रकार ओळखा.
(1) समापन कर्मणी (2) नवीन कर्मणी (3) पुराण कर्मणी (4) यापैकी नाही

27. खाली दिलेल्या कोणत्या पर्यायी उत्तरात आत्मवाचक सर्वनाम असणारे वाक्य आहे ?
(1) धीराने उभा राहणाराच लोकोत्तर लाभाचा धनी होतो.
(2) मनुष्याचा सर्वात मोठा शत्रू तो स्वत: असतो.
(3) सावित्रीबाईंचं सारं काम आटोपलं होतं.
(4) त्यांनी माझ्याकडून काम करवून घेतलं.

28. उदाहरण व त्याकरिता वापरलेला वाक्प्रचार यांचा विसंगत वापर कोणत्या पर्यायी उत्तरात केला आहे ?
(1) त्यांनी त्याच्यावर इतके उपकार केले, की कृतज्ञ बनून त्याने त्यांचा पाणउतारा केला.
(2) मालाची शहानिशा करूनच माल ताब्यात घ्या.
(3) त्या दोघांचे चांगलेच मेतकूट जमले आहे.
(4) त्यांनी त्याला चांगलेच पाणी पाजले.

29. पुढील वाक्यातील उभयान्वयी अव्ययाचा प्रकार कोणता ?
'अभ्यासात सातत्य म्हणजे हमखास यश'
(1) परिणामबोधक (2) स्वरूपबोधक (3) कारणबोधक (4) विकल्पबोधक

**30.** खालील शब्दाची योग्य वर्णरचना कोणती ते पर्यायी उत्तरांतून सांगा.

'ईश्वर'

(1) इ+श्+व्+अ+र्+अ (2) ई+श्+व्+र्+अ

(3) ई+श्+व्+अ+र्+अ (4) इ+श्+व्+र्+अ

---

**31.** पर्यायी उत्तरांतील कोणते वाक्य मिश्रवाक्य आहे, ते सांगा.

(1) ईश्वराचे स्वरूप निर्विकार आहे.

(2) मामांनी मला जत्रेतून एक पतंग आणला आणि ताईला एक बाहुली आणली.

(3) तू जे बोलतोस ते तुला शोभत नाही.

(4) ईश्वर निर्मळ आहे. मी त्याला वंदन करतो.

---

**32.** वाक्यातील अधोरेखित क्रियापदाचा प्रकार ओळखा.

'चेंडू' सीमारेषेबाहेर जाऊन स्थिरावला.

(1) संयुक्त क्रियापद (2) साधित क्रियापद (3) प्रयोजक क्रियापद (4) शक्य क्रियापद

---

**33.** योग्य जोड्या जुळवा.

| | *विभक्ती* | | *प्रत्यय* |
|---|---|---|---|
| A. | द्वितीया | अ. | चा, ची, चे |
| B. | तृतीया | ब. | ने, ए, शी |
| C. | पंचमी | क. | स, ला, ते |
| D. | षष्ठी | ड. | ऊन, हून |

(1) A-अ, B-ब, C-क, D-ड (2) A-ड, B-क, C-ब, D-अ

(3) A-क, B-ब, C-ड, D-अ (4) A-क, B-अ, C-ब, D-ड

---

**34.** 'देशगत' हे कोणत्या समासाचे उदाहरण आहे ?

(1) तृतीया तत्पुरुष (2) षष्ठी तत्पुरुष (3) द्वितीया तत्पुरुष (4) सप्तमी तत्पुरुष

---

**35.** पुढीलपैकी मराठी प्रत्यय लागून झालेली शब्दसाधिते कोणती ?

(1) उनाडकी, भांडखोर, वेडसर (2) यादव, राघव, सौभद्र

(3) महत्त्व, जडत्व, धनवान (4) उत्कंठित, कुलीन, नवीन

---

**36.** 'रक्षक' या धातुसाधितातील संस्कृत प्रत्यय कोणता ?

(1) क (2) रक्ष (3) क्षक (4) अक

---

**37.** पुढीलपैकी मराठी उपसर्ग असलेले शब्द कोणते ?

(1) अतिशय, अधिपती, अध्ययन (2) अपयश, अपमान, अपकार

(3) अवमान, अवकृपा, अवनत (4) अजाण, अदपाव, अवजड

---

38. पुढीलपैकी देशी किंवा देशज शब्द नसलेला पर्याय ओळखा.
(1) बोका, रेडा, बाजरी
(2) सासू, दूध, ओठ
(3) पोट, गुडघा, लुगडे
(4) झोप, ढेकूण, कंबर

39. 'आम्ही गहू खातो', या वाक्याचा अर्थ कोणत्या शब्दशक्तीद्वारे समजून घ्यावा लागतो ?
(1) आर्थीव्यंजना (2) अभिधा (3) व्यंजना (4) लक्षणा

40. 'अ' कार विल्हेनुसार पुढील शब्दांची मांडणी करा.
अ. तिडीक
ब. तितिक्षा
क. तिळतीळ
ड. तिरीमिरी
(1) ब, अ, क, ड (2) अ, ब. ड, क (3) ड, अ, क, ब (4) क, अ, ब, ड

41. योग्य पर्याय निवडा.
(अ) अभिधा, लक्षणा व व्यंजना या तीन शब्दशक्ती आहेत.
(ब) यातून अनुक्रमे वाच्यार्थ, लक्ष्यार्थ व व्यंगार्थ असे तीन अर्थ प्रगट होतात.
(1) 'अ' आणि 'ब' बरोबर
(2) 'अ' बरोबर 'ब' चूक
(3) 'अ' चूक 'ब' बरोबर
(4) 'अ' आणि 'ब' दोन्ही चूक

42. 'तट्टीका' या संधीचा विग्रह करा.
(1) ततः + टीका (2) त् + ट् + ई + का (3) तत् + टीका (4) त्रा + टीका

43. पुढीलपैकी संकेतार्थी वाक्य ओळखा.
(1) उद्या पाऊस येईल – शाळेला सुट्टी होईल.
(2) उद्या पाऊस आला तर शाळेला सुट्टी होईल.
(3) उद्या पाऊस आल्यामुळे शाळेला सुट्टी होईल.
(4) उद्या पावसामुळे शाळेला सुट्टी होईल.

44. शब्दाच्या आधी काही अक्षरे जोडली जातात. व्याकरणाच्या भाषेत त्यांना ________ असे नाव आहे. रिकाम्या जागी अचूक पर्याय शोधून लिहा :
(1) उपसर्ग (2) प्रत्यय (3) तत्सम (4) तद्भव

45. 'पानपतवर सव्वा लाख बांगडी फुटली' हे विधान शब्दशक्तीचा कोणता प्रकार सूचित करते ?

(1) अभिधा (2) लक्षणा (3) व्यंजना (4) यापैकी काहीही नाही

46. खालील वाक्याचा प्रकार ओळखा.

'दिपकला जांभळाची खूप झाडे दिसली'

(1) संयुक्तवाक्य (2) नकारार्थी (3) केवलवाक्य (4) मिश्रवाक्य

47. 'साप' हा शब्द उच्चारल्याबरोबर आपल्या डोळ्यासमोर एक सरपटणारा प्राणी येतो. हा अर्थ व्यक्त करण्याच्या शब्दातील शक्तीला काय म्हणतात ?

(1) अभिधा (2) लक्षणा (3) व्यंजना (4) यापैकी काहीही नाही

48. खालील वाक्याचा प्रयोग ओळखा.

'थोरांकडून सत्य बोलले जाते'

(1) प्रधानकर्तृक कर्मणी (2) कर्तरी प्रयोग (3) भावे प्रयोग (4) नवीन कर्मणि प्रयोग

49. स्वातंत्र्य युद्धाच्या काळात देशभक्तांनी भोगलेला तुरुंगवास म्हणजे राष्ट्रहितासाठी दिलेली अग्निपरीक्षाच होती. या विधानातील अग्निपरीक्षा या शब्दातून कोणता अर्थ व्यक्त होतो ?

(1) लक्ष्यार्थ (2) वाच्यार्थ (3) वाक्यार्थ (4) शब्दार्थ

50. जिच्या गळ्यात गंधार आहे असं दीनानाथ म्हणायचे, तीच ही स्वरसम्राज्ञी लता या वाक्यातील गौण वाक्य कोणते ते शोधून काढा :

(1) तीच ही स्वरसम्राज्ञी लता

(2) जिच्या गळयात गंधार आहे असं दीनानाथ म्हणायचे

(3) यापैकी नाही

(4) यापैकी सर्वच

51. 'र' या व्यंजनाची जोडाक्षरे लिहिण्याच्या किती पध्दती आहेत ?

(1) एक (2) दोन (3) तीन (4) चार

52. 'तोंडी लावणे' हा सामासिक शब्द समासाच्या कोणत्या प्रकारातील आहे ?

(1) उपपदतत्पुरुष (2) अलुक् तत्पुरुष

(3) कर्मधारय (4) द्विगू

53. खालील वाक्यातील प्रयोग ओळखा.

'त्याने आता घरी जावे.'

(1) सकर्मक कर्तरी प्रयोग
(2) अकर्मक कर्तरी प्रयोग
(3) सकर्मक भावे प्रयोग
(4) अकर्मक भावे प्रयोग

---

54. पुढीलपैकी 'पूर्वरूप संधी' चे योग्य उदाहरण कोणते ?

(1) खिडकी + आत = खिडकीत
(2) न + उमजे = नुमजे
(3) घाम + ओळे = घामोळे
(4) एक + एक = एकेक

---

55. 'अलीकडे मी तुम्हाला एकही पत्र लिहिले नाही' या वाक्यातील उद्देश्य कोणते ?

(1) अलीकडे (2) तुम्हाला (3) मी (4) पत्र

---

**पुढील उतारा वाचून त्यावर आधारित 56 ते 60 प्रश्नांची उत्तरे द्या.**

समर्पित जीवन हा यशवंतरावांचा आदर्श होता. कारण –

"जीवन पराकोटीचे समर्पित असेल, तर ते जीर्ण होत नाही. चंद्र कधी जुना होत नाही, सूर्याला म्हातारपण येत नाही, दर्या कधी संकोचत नाही. यांतील प्रत्येकाच्या जीवनात पराकोटीचे समर्पण आहे. पण अनंतयुगे लोटली, तरी विनाश त्यांच्याजवळ पोहोचलेला नाही. काळाने त्यांना घेरलेले नाही. त्यांचा कधी कायापालट नाही. स्थित्यंतर नाही. ते निष्वसन अखंड आहे."

"हे जग कलात्मक आनंदाकरताच निर्माण करण्यात आलेली शक्ती आहे. या कलेत स्फूर्ती आहे, माणुसकी आहे. केवळ वैज्ञानिक हिशोब म्हणजे जग नव्हे. कला आणि पावित्र्य यांचा हा सुरेख संगम आहे." अशी कलासक्त धारणा मनात बाळगून जगणारे यशवंतराव सतत मीपण विसरून स्वर्गीय आनंद देणाऱ्या प्रसंगांच्या अखंड शोधात असायचे. असा क्षण मिळणे हाच त्यांना विरंगुळा वाटायचा. असे क्षण जेवढे जास्त मिळतील, तेवढे जीवन सुखी अशी त्यांची धारणा होती. सुखाच्या या क्षणांचे वर्णन ते करतात :

"जीवनात सुखाचे क्षण येतात, ते सूर्याच्या कोवळया किरणांसारखे सोनेरी व सतेज असतात. ते क्षणभर राहतात आणि नंतर कडक होतात. परंतु ज्या वेळी हे किरण कोवळे दिसतात, त्या वेळी त्यांचे ते तेज, ते रम्य स्वरूप पाहून मनाला आल्हाद वाटतो, गंमत वाटते. नदीच्या खोल डोहात दगड टाकला, की पाण्यावर तरंग उठतात, एकातून एक अशी वर्तुळे उठतात आणि पाहणाऱ्याला मोठी मजा वाटते. जंगलातल्या वाटेने जात असताना उन्हाच्या वेळी एखादा झरा दिसला, की त्याचे पाणी पिताना केवढा आनंद होतो... ओढ्याच्या काठी भरगच्च जांभळांनी भरलेल्या झाडाची चार जांभळे तोंडात टाकली की, ती किती गोड लागतात... जीवनामधील आनंदाचे क्षण हे असे असतात."

**56.** यशवंतराव चव्हाणांच्या मते समर्पित जीवन हे –

(1) चिरंतन-शाश्वत असते.

(2) सुखाचे असते.

(3) केवळ आनंदासाठीच असते.

(4) अजीर्ण होत नाही.

---

**57.** सुखी जीवन म्हणजे –

(1) मीपण रहित स्वर्गीय आनंद मिळविणे.

(2) केवळ समर्पित जीवन.

(3) माणुसकी-सम्पन्न जीवन.

(4) यापैकी नाही.

---

**58.** योग्य विधान निवडा.

(1) जीवन हे कलासक्त असावे.

(2) जीवन हे पवित्र असावे.

(3) कलेत स्फूर्ती, माणुसकी व वैज्ञानिक हिशेब असतो.

(4) जग हे कला व पावित्र्य यांचे उचित एकत्रीकरण आहे.

---

**59.** या उताऱ्यावरून् यशवंतराव हे –

(1) भोगानंदी दिसतात.

(2) कलासक्त दिसतात.

(3) कर्तव्यपरायण जीवनास्वादी वाटतात.

(4) विषयात् सुखाचा शोध घेणारे व्यक्तिमत्व वाटतात.

---

**60.** प्रस्तुत उताऱ्यास योग्य शीर्षक द्या.

(1) कला आणि जीवन

(2) यशवंतहृदय

(3) जीवनभाष्य

(4) जीवनशोध

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

61. Substitute the underlined word with a suitable synonym from the options given below :

He stood in the vestibule of the hotel.

(1) pantry (2) lobby (3) kitchen (4) basement

62. He is deeply in love with her.

Substitute the underlined word with a phrase nearest in meaning :

(1) through thick and thin
(2) heartily and soulfully
(3) in a tangle
(4) head over heels

63. The floods have caused __________ harm.

Choose the right antonym of the word 'calculable' for filling the blank :

(1) uncalculable (2) discalculable
(3) miscalculable (4) incalculable

64. a. They organized a buffet dinner for the wedding reception.

b. The waves buffet the rocks with great force.

The underlined words respectively rhyme with :

(1) turret and say
(2) say and turret
(3) Both turret and say
(4) Neither turret nor say

65. a. I have no further consult with my father's firm.

b. I have no further consult to my father's firm.

c. I have no further concern with my father's firm.

d. I have no further concern to my father's firm.

The grammatically correct sentences are

(1) Both a and c (2) Both b and d
(3) Only a (4) Only c

**66.** a. The documents are in her possession.

b. Only repeatation will given you practice.

c. His emoluments have been raised.

d. The war of succession continues.

The underlined words in the above sentences are correctly spelt in :

(1) a and b (2) b, c and d

(3) c and d (4) All four

---

**67.** a. If you will work hard, you will certainly succeed.

b. If you would have worked hard, you would have succeeded.

c. If you saw him you would recognize him.

d. Had you seen him, you would have recognized him ?

Which of the above sentences are grammatically correct ?

(1) Only a and b are correct

(2) Only c and d are correct

(3) Only a, b and d are correct

(4) Only b and d are correct

---

**68.** "Eek ! There's a fly in the soup. Waiter !" screamed Sarita.

Put into indirect speech, the sentence should be :

a. Sarita screamed that eek, there was a fly in the soup. She added waiter.

b. Sarita screamed at the waiter that there was a fly in the soup.

c. Sarita saw a fly in her soup and screamed for the waiter.

d. Sarita saw a fly in the soup and screamed at the waiter.

Which of the above sentences is grammatically most acceptable ?

(1) Only a (2) Only b (3) Only c (4) Only d

---

**69.** You have to catch the train. You must leave immediately.

Combine the two sentences to make a compound sentence

(1) You must leave immediately in order to catch the train.

(2) If you don't leave immediately, you won't catch the train.

(3) If you have to catch the train, you must leave immediately.

(4) You have to catch the train, hence you must leave immediately.

---

70. "Rajan will meet Umesh at the shop in the evening to deliver the message."

Which 'wh' word should the question begin with to get the underlined word as answer ?

(1) Who (2) Whom (3) Where (4) Why

71. a. Suspend
b. Soluble
c. Silly
d. Dominant

The noun forms of the above words take '-ance', '-ity', '-ness', or '-sion' as suffix. Choose the right option :

(1) a -sion, b -ness, c -ness, d -ance
(2) a -ance, b -ness, c -sion, d -ity
(3) a -ance, b -ity, c -ness, d -sion
(4) a -sion, b -ity, c -ness, -ance

72. The word 'well' may be used as :

(1) Noun and Adverb (2) Only Noun
(3) Only Adverb (4) Noun, Verb and Adverb

73. The train should arrive any time now.

The underlined modal expresses :

(1) obligation (2) anticipation
(3) suggestion (4) instruction

74. Identify the grammatically correct sentence/s :
a. She leaves for London this evening.
b. He is having a headache.
c. She has finished her work an hour ago.
d. It has been raining heavily since two hours.

(1) Only a (2) Only b
(3) Only a, b and d (4) Only b, c and d

**75.** Which of the following sentences may indicate a future event ?

a. The movie starts in ten minutes.

b. The sample is being sent for detailed examination.

c. You should finish the work before you leave.

d. I meet them at the hotel and we start off.

(1) Only a and b (2) Only c and d

(3) Only a and c (4) All

---

**76.** Measles __________ quite a lot of discomfort.

Fill in the blank with an acceptable form of the verb given below :

(1) cause (2) causes

(3) are causing (4) have caused

---

**77.** 350 runs ___________ quite a decent score.

Fill in the blank with an acceptable form of the verb given below :

(1) is (2) are

(3) are being (4) was become

---

**78.** Which part of the sentence below contains an error ?

I think so (a) that a bit of help from you (b) will help him (c) get over his current crisis. (d)

(1) a (2) b (3) c (4) d

---

**79.** You told us they insisted where we could throw the garbage.

Use punctuation signs so as to get a meaningful sentence.

(1) You told us, "They insisted where we could throw the garbage."

(2) "You told us," they insisted, "where we could throw the garbage ?"

(3) "You told us," they insisted, "where we could throw the garbage."

(4) You told us. They insisted, "where we could throw the garbage ?"

---

80. You are just too fast. I cannot stay along with you.

Choose the appropriate phrase to substitute the underlined words :

(1) stay equal to (2) match along with

(3) keep up with (4) run along by

81. When she heard about the accident she started crying ?

Replace the underlined word by the most suitable phrase.

(1) broke up (2) broke out

(3) broke down (4) broke off

82. He will have to raise the wind for his new enterprise.

The underlined idiom may be substituted by :

(1) struggle (2) find workers

(3) find resources (4) travel

83. Give a single word for one who compiles dictionary.

(1) Calligrapher (2) Editor (3) Compiler (4) Lexicographer

84. The father was very angry __________ his son.

Choose the correct option to fill in the blank.

(1) with (2) at (3) against (4) from

85. Select an appropriate suffix to make an adjective of the following word.

barber__________ .

(a) -ic (b) -ism (c) -ity (d) -ous

(1) only (a) (2) only (b)

(3) (b) and (d) only (4) (a) and (d) only

86. Identify the word which is similar in meaning to the underlined word.

The new officer is a brash young man.

(1) showy (2) rude

(3) impudent (4) All the above three are correct

87. Fill in the blank with proper preposition given below :

Has your father arrived ________ home yet ?

(1) to (2) at

(3) in (4) No article

---

88. Identify the odd sentence from the following.

a. The butter is kept here.

b. The window was broken.

c. The bridge is being repaired.

d. I remember my father taking me to the zoo.

(1) a only (2) b and c only

(3) d only (4) c only

---

89. Choose the correct option and fill in the blank :

Owing to a __________ there was famine in the country.

(1) draught (2) draft

(3) drought (4) None of the above

---

90. Choose the correct option and change the following into indirect speech.

He said, "I have read this novel."

(1) He said that he had read that novel.

(2) He said that he read this novel.

(3) He said that he has read this novel.

(4) He said that he had been reading this novel.

---

91. Mark the sentence in which the word 'after' is used as an adverb.

(1) He takes after his father.

(2) After ages shall sing his glory.

(3) We went away after they had left.

(4) They arrived soon after.

---

92. Mark out the incorrect sentence.

a. Barley, wheat and rice are cereals.

b. There are eggs and bacon for breakfast.

c. Two pounds of coffee cost seven and six pence.

d. The radio which you gave my children works perfectly.

(1) a and b only

(2) b and c only

(3) a and d only

(4) b only

---

93. Choose the correct option and fill in the blank :

They began their journey ________ sunset.

(1) at (2) on

(3) in (4) upon

---

94. Choose the correct sentence from the following.

a. The Prime Minister lives in 10 Downing Street.

b. Sherlock Holmes lived in Baker Street.

c. His father works into a bank.

d. My married sister lives at Manchester.

(1) a only

(2) b only

(3) a and c only

(4) d only

---

95. Choose the correct verb from the options :

The dentist decided to _________ my decayed tooth.

(1) exhale

(2) extort

(3) extract

(4) exit

**(For Questions 96 to 100)**

Read the following passage and answer questions 96 to 100 :

Everyone likes to blame his sense of defeat on someone else; and for some time scientists have been a favourite scapegoat. I want to look at their responsibility, and for that matter at everybody's rather closely. They do have a special responsibility; but it is a complicated one, and not the whole responsibility. For example, science obviously is not responsible for the readiness of people, who do not take their private quarrels beyond the stage of insult. to carry their public quarrels to the point of war. Many animals fight for their needs, and some for their mere greed, to the point of death. Bucks fight for females, and birds fight for their territories. The fighting habits of man are odd because he displays them only in groups. But they were not supplied by scientists. On the contrary, science has helped to end several kinds of group murder, such as witch hunting and the taboos of the early nineteenth century against disinfecting hospitals.

Neither is science responsible for the existence of groups which believe themselves to be in competition; for the existence, above all, of nations. And the threat of war today is always a national threat. Some bone of contention and competition is identified with a national good, and in the end nations are willing to organize and to invite the death of citizens on both sides in order to reach these collective aims. Science did not create the nations – on the contrary, it has helped to soften those strong national idiosyncrasies which it seems necessary to exploit if war is to be made with enthusiasm.

The sense of doom in us today is not a fear of science; it is a fear of war. And the causes of war were not created by science. No, science has not invented war; but it has turned it into a very different thing. Science has enlarged the mechanism of war, and it has distorted it.

---

**96.** On the basis of the passage, complete the following sentence using the best of the options given below :

The passage suggests that most people think that for the existence of war ...

(1) nations are responsible

(2) scientists are responsible

(3) animals are responsible

(4) All of the above

---

97. On the basis of the passage, choose the best option to complete the sentence given below :

According to the author, ...

(1) people do not take their private quarrels beyond insult

(2) people convert their private quarrels into public quarrels

(3) people take their private quarrels to the point of war

(4) people fight to the point of death

98. Which of the following statements is NOT mentioned as a reason for animals fighting with each other ?

(1) for their survival needs
(2) only when in groups
(3) for territories
(4) for mating partners

99. On the basis of the passage, complete the following statement using the best option given below :

According to the passage, science has helped ...

a. in the creation of groups

b. in the prevention of group murder

c. in ending the custom of witch hunting

d. in ending the taboo against disinfecting hospitals

(1) Only a

(2) Only a, b and c

(3) Only b, c and d

(4) All four

100. On the basis of the passage, complete the statement with the best of the options given below :

The purpose of the passage is ...

(1) to blame scientists for the existence of war

(2) to defend science from the blame of inventing war

(3) to show that war is a natural phenomenon

(4) to highlight the benefits of science

# सूचना – (पृष्ठ 1 वरून पुढे.....)

(8) प्रश्नपुस्तिकेमध्ये विहित केलेल्या विशिष्ट जागीच कच्चे काम (रफ वर्क) करावे. प्रश्नपुस्तिकेव्यतिरिक्त उत्तरपत्रिकेवर वा इतर कागदावर कच्चे काम केल्यास ते कॉपी करण्याच्या उद्देशाने केले आहे, असे मानले जाईल व त्यानुसार उमेदवारावर शासनाने जारी केलेल्या ''परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचे अधिनियम-82'' यातील तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.

(9) सदर प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपल्यानंतर उमेदवाराला ही प्रश्नपुस्तिका स्वत:बरोबर परीक्षाकक्षाबाहेर घेऊन जाण्यास परवानगी आहे. **मात्र परीक्षाकक्षाबाहेर जाण्यापूर्वी उमेदवाराने आपल्या उत्तरपत्रिकेचा भाग-1 समवेक्षकाकडे न विसरता परत करणे आवश्यक आहे.**

## नमुना प्रश्न

प्र. क्र. **201.** ''अंगावर काटा उभा रहाणे'' या वाक्यप्रचाराचा अर्थ काय ?

(1) अंग शहारणे (2) रोमांचित होणे

(3) अतिशय भिती वाटणे (4) बहरुन येणे

ह्या प्रश्नाचे योग्य उत्तर ''(3) अतिशय भिती वाटणे'' असे आहे. त्यामुळे या प्रश्नाचे उत्तर ''(3)'' होईल. यास्तव **खालीलप्रमाणे** प्रश्न क्र. **201** समोरील उत्तर-क्रमांक ''③'' हे वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखविणे आवश्यक आहे.

प्र.क्र. **201.** ① ② ● ④

अशा पद्धतीने प्रस्तुत प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाचा तुमचा उत्तरक्रमांक हा तुम्हाला स्वतंत्ररीत्या पुरविलेल्या उत्तरपत्रिकेवरील त्या त्या प्रश्नक्रमांकासमोरील संबंधित वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखवावा. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

## कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK

SEAL